**अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूर्ती या योजनेसाठी निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- निविप्र - २०१९/प्र.क्र.५६/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- १५ जानेवारी, २०२०

**संदर्भ :-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. एफईडी १५९२ /१२०२ /११३२ / साशि-५, दिनांक १८ ऑक्टोबर,१९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.४७ /एसडी-५, दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९.
३. वित्त विभागाचे शासन परीपत्रक क्र. अर्थसं२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३; दि. ०८.०७.२०१९.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. निविप्र-२०१९/प्र.क्र.५६/एसडी-५, दिनांक १९ ऑक्टोबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. (१) येथिल शासन निर्णयानुसार राज्यातील टंचाईग्रस्त भागातील विद्यार्थ्यांची परीक्षा फी मफीची योजना कार्यन्वीत आहे. सदर योजनेत संदर्भ क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये विद्यार्थ्यांना फीची प्रतीपूर्ती /माफ करण्यात येणाऱ्या परीक्षा शुल्काच्या रकमेत प्रात्यक्षिक शुल्क, गुणपत्रिका शुल्क, गुणवत्ता प्रमाणपत्र शुल्क इ. समाविष्ट करण्यात आला आहे. तसेच विद्यार्थ्यांना प्रतीपूर्ती करण्याच्या कार्यपद्धतीत सुधारणा करण्यात आली आहे. संदर्भ क्र. (३) येथिल वित्त विभागाच्या परिपत्रकामधील निदेशांनुसार राज्यातील पूर्व माध्यमिक/माध्यमिक शाळा शिष्यवृत्ती योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पिय मंजूर तरतूदीच्या ६० टक्के रक्कम संदर्भ क्र. (४) च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूर्ती या योजनेसाठी अर्थसंकल्पित रक्कमेपैकी उर्वरीत ४० टक्के निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात राज्यातील अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूर्ती या योजनेसाठी रु. ५४.३९ लक्ष इतका निधी अर्थ्संकल्पित असून यापैकी रु.३२.६३४ लक्ष(६० टक्के)इतका निधी संदर्भ क्र (४) च्या शासन निर्ण्यान्वये वितारीत करण्यात आला आहे. नियोजन विभाग व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून सदर योजनेसठी उरवरीत ४० टक्के रक्कम म्हणजे रु.२१.७५६ लक्ष (एकवीस लाख पंच्याहत्तर हजार सहाशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणाऱ्या खर्चासाठी “मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधरण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ०४ अवर्षणग्रस्त भागातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी, (०४)(०१) अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फीची प्रतीपूर्ती (कार्यक्रम) (२२०२ २५८८), ३४ शिष्यवृत्या/ विद्यावेतने” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/ नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय, पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.याबाबतीत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे/शासन निर्णय/शासन परीपत्रक यामधील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील. तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि. ०८.०७.२०१९मधील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.७४९/१९/व्यय-५,दि.१७.१२.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११५१६४६५६०८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.01.15 16:27:23 +05'30'

**(राजेंद्र पवार)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
२. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद)
३. अप्पर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
४. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय, पुणे
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १व २ मुंबई व नागपूर
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २ मुंबई व नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे.
१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१४. निवड नस्ती.